**सन २०१८-२०१९ मधील कांदा अनुदान आयसीआयसीआय बँकेकडून प्राप्त झालेल्या व्याजाच्या रकमेमधून वितरित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय,क्रमांक:- सपस-२०२०/प्र.क.७१ /२४ स**

मंत्रालय, मुंबई -३२

दिनांक :- १६ जून, २०२०

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स,दिनांक २६ डिसेंबर, २०१८

२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स,दिनांक ३१ जानेवारी, २०१९ व दिनांक १५ फेब्रुवारी,२०१९,

३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स,दिनांक १६ फेब्रुवारी, २०१९

४) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स,दिनांक ८ मार्च, २०१९

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक :- पुरक-२०१९/प्र.क्र.२९/१७ स, दिनांक १० जुलै, २०१९

६) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:-पूरक-२०१९/प्र.क्र.७९ /२४ स,दिनांक ७ ऑगस्ट, २०१९

७) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:-सपस-२०१९/प्र.क्र.१२६/२४ स,दिनांक १९ ऑगस्ट, २०१९

८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक :- पुरक-२०१९/प्र.क्र.१०८/१७ स, दिनांक ०४ जानेवारी, २०२०

९) सहसंचालक ( पणन ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र
क्रमांक :- पणन-१३/कांदा अ २०१८-१९/शिल्लक रक्कम/खर्च/मान्यता २०२०, दिनांक १० जून , २०२०.

<u>**प्रस्तावना:-**</u>

शासन निर्णय, दिनांक २६ डिसेंबर २०१८ अन्वये सुरुवातीस राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समिती व प्रसन्ना कृषी मार्केट, पाडळीआळे, जि. अहमदनगर या खाजगी बाजार समितीमध्ये १ नोव्हेबर

२०१८ ते १५ डिसेंबर २०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या पात्र शेतकऱ्यांना रुपये २०० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी या प्रमाणात अनुदान मंजूर करण्यात आले आहे. या योजनेंतर्गत कांदा अनुदानाचा कालावधी वेळोवेळी वाढविण्यात आला असून, सुधारित अंतिम कालावधी दिनांक १ नोव्हेबर २०१८ ते २८ फेब्रुवारी २०१९ असा निश्चित करण्यात आला आहे.

पहिल्या टप्प्यातील कांदा अनुदान वितरित करण्यासाठी आकस्मिक निधीतून रुपये ११४.८० कोटी इतका निधी शासन निर्णय, दिनांक १६/२/२०१९ अन्वये उपलब्ध करुन दिला होता. तद्नंतर दुसऱ्या टप्प्यातील अनुदानासाठी रुपये ३८७.३०३१ कोटी निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करुन शासन निर्णय, दिनांक ७/८/२०१९ अन्वये उपलब्ध करुन दिला आहे. पहिल्या टप्प्यातील कांदा अनुदान वितरित करण्यासाठी होणारा विलंब विचारात घेऊन, दुसऱ्या टप्प्यातील कांदा अनुदान आयसीआयसीआय बँकेमार्फत करण्यास दिनांक १९/८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली असून कांदा अनुदान वितरणाचे काम अंतिम टप्प्यात आले आहे. आतापर्यंत एकूण ५,५३,२०४ शेतकऱ्यांना रुपये ५०३.५५ कोटी अनुदान वितरित झाले आहे.

शासन निर्णय, दिनांक १९/८/२०१९ अन्वयें, आयसीआयसीआय बँकेमार्फत कांदा अनुदान वितरित करण्यास मान्यता देताना वित्त विभागाने नमुद केलेल्या अटी व शर्तीमध्ये अट क्रमांक ॥ पुढील प्रमाणे आहे:-

**अट क्रमांक** ॥ - " सदर बचत खात्यातून प्राप्त होणाऱ्या व्याजाचा वापर सदर योजनेच्या अंमलबजावणी करिताच करण्यात यावा."

आयसीआयसीआय बँकेमध्ये जमा केलेल्या निधीतून दिनांक ४/५/२०२० अखेर रुपये ३०.०९ लाख इतके व्याज पणन संचालनालयाच्या खात्यात जमा झालेले आहे.

पणन संचालनालयाने दिनांक १३ डिसेंबर, २०१९ च्या पत्रान्वयें वाशिम, चंद्रपूर व सोलापूर या जिल्हयांसाठीचा तसेच दिनांक ६/१/२०२० च्या पत्रान्वये जळगांव व यवतमाळ जिल्ह्यातील प्रलंबित लाभार्थ्यांच्या कांदा अनुदानाचा प्रस्ताव सादर केला होता. सदर प्रस्ताव हिवाळी अधिवेशनापूर्वी सादर करावयाच्या पुरवणी मागणींच्यावेळी सादर करणे अपेक्षित होते. तथापि, सदर प्रस्ताव विलंबाने सादर झाल्यामुळे पुरवणी मागणीद्वारे निधी उपलब्ध करुन घेता आला नाही.

राज्यातील कोरोनामुळे निर्माण झालेली परिस्थिती विचारात घेता, कांदा अनुदानासाठी नव्याने पुरवणी मागणी सादर करुन निधी उपलब्ध करुन घेण्यास पुष्कळ कालावधी लागणार आहे. वित्त विभागाने व्याजाची योजनेच्या अंमलबजावणीकरिता वापरण्यास परवानगी दिलेली आहे. यास्तव पणन

संचालनालयाच्या बँक खात्यात असलेली व्याजाची रक्कम जळगांव,यवतमाळ, वाशिम व चंद्रपूर या जिल्ह्यातील पात्र लाभार्थ्यांना वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयसीआयसीआय बँकेकडून प्राप्त झालेल्या व्याजाचा विनियोग कांदा अनुदानासाठी करणे आवश्यक असल्याने तसेच राज्यात कोविड-१९ मुळे निर्माण झालेली परिस्थिती विचारात घेऊन जळगांव, यवतमाळ, वाशिम व चंद्रपूर जिल्ह्यातील पात्र लाथार्थ्यांचे प्रलंबित कांदा अनुदान आयसीआयसीआय बँकेकडून प्राप्त झालेल्या व्याजातून वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान आयसीआयसीआय बँकेमार्फत अदा करण्यात यावे.

३. जिल्हानिहाय कांदा अनुदान वितरित करण्याचा तपशिल पुढीलपमाणे आहे:-

| अ.क्र. | जिल्हा | लाभार्थ्यांची संख्या | वितरित करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| १ | जळगांव | १५४ | २२,१०,००४.०० |
| २ | यवतमाळ | २ | ६७,०००.०० |
| | उमरखेड कृषी उत्पन्न बाजार समिती | १० | ३,३७,६००.०० |
| ३ | वाशिम | ५ | १,०८,४००.०० |
| ४ | चंद्रपूर | ५ | ४५,५४६.०० |

४. सदर अनुदान वितरित केल्याचा अहवाल पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी १ महिन्यात शासनास सादर करावा.

५. व्याजाची शिल्लक राहिलेली रक्कम शासनास समर्पित करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००६१६१२४२१२३६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI , serialNumber=8c5d0f275c3d9a21db07fecf7919c2d83796e88930d62d44e7a4a6d4cbee7e0e, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KALU GONYA VALVI
Date: 2020.06.16 12:51:18 +05'30'

(का.गो.वळवी)
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१) मा.मंत्री (सहकार व पणन) मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री ( पणन ) मंत्रालय, मुंबई.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अ.मु.स. ( नियोजन ) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (पणन )सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) कृषि आयुक्त,महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
१०) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
११) सर्व विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था,
१२) सर्व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था ,
१३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ), मुंबई/नागपूर,
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) लेखा कोषागार अधिकारी,पुणे,
१६) अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७) निवडनस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई